# माझ्या विद्या-विज्ञान व्यासंगाचा बायोडाटा

जीवन हा अज्ञातांतील प्रवास आहे. बहुतेक लोक जीवनाच्या वाटचालीचें सरळ निवेदन करतात. मला हें जमतहि नाहीं आणि पटतहि नाहीं. जीवन बे दुने चार अशा गणितागत पद्धतीनें व्यतींत होत नसतें तर तें बे दुने सहा कधी आठ कधी दहा, बहुधा अशाच पद्धतीनें चालत असतें.

कोणत्याहि वाङ्मयाचा पाया मानवाची अभिरूची असतां कामा नये. कारण ‘‘जन्मना जायते शूद्रः संस्कारात् द्विज उच्यते।’’ या शूद्रत्वाची कमीत कमी वयोमर्यादा वयाची २५ वर्षें मानली आहे. मी एक अतिसामान्य माणूस असल्यामुळें व्यक्तित्त्वांतील हें शूद्रत्व संपण्यास मला पूर्ण ६० वर्षें लागली. त्यानंतर माझ्या अल्पमतीप्रमाणें हें शूद्रत्व संपून आपण पुरेसे प्रबुद्ध झालो आहोत असे जाणवल्यानंतरच वयाच्या ६५ व्या वर्षी मी लेखन करण्यास सुरवात केली. ‘‘ज्ञानदेव शक’’ हा माझा पहिला लेख २००३ सालांतील आहे. नंतरच्या काळांत म्हणजे २००५पर्यन्त ज्ञानदेव आणि ज्ञानेश्वरी याच विषयावर ४ लेख लिहिले. मध्यंतरीच्या काळांत ‘शिवशक’, ‘महाराष्ट्र दिन’, ‘विश्वशक’ तसेच महाराष्ट्राच्या अस्मितेला अनुसरून मी जी ‘‘महाराष्ट्र पंचांग दिनदर्शिका’’ तयार

केली, तिचें पूर्ण स्वरूप विशद करणारे ४ लेख लिहिले.

ज्ञान ग्रहणाचें आणि ज्ञान दानाचें एक प्रभावी साधन या दृष्टीने कांहीं काळ संशोधन करून मी एक कॅसेट टेप रेकॉर्डर तयार केला. हा संपूर्ण ओपन आहे. कॅसेट ड्राईव्ह करणारा मेकॅनिझम, प्री ॲम्प्लिफायर, मेन ॲम्प्लिफायर, ऑस्सिलेटर, ऑटोमॅटिक लेव्हल कन्ट्रोल, रेक्टिफाईड डी.सी. आर. पी. स्वीच, रेग्युलेटेड पॉवर सप्लाय यांतील सर्व कॉम्पोनन्ट्स हे वायर्ससहित सगळे ओपन आहे. याचें कलर छायाचित्रहि काढून ठेवले आहे. तसेच या विद्युत् मंडल योजनेचा डायग्राम तयार केला आहे. याची रचना आणि कार्यपद्धतीचें आकलन होण्यासाठीं एक विस्तृत लेख लिहिला आहे. यावर बबनराव गरूड, सतीश जोशी अशा गायकांची गाणी रेकॉर्ड केली आहेत. बबनरावांनी तर तबला पेटीचा एक जोड कितीतरी दिवस माझ्या घरींच ठेवला होता.

गो. नी. दांडेकर. त्यांच्याच भाषेंत बोलायचे झाल्यास ते माझें घट्ट मित्र होते. त्यांची मला अतिशय प्रिय झालेली कादंबरी "मृण्मयी". त्यावर रसग्रहणात्मक फार मोठा लेख मी लिहिला आहे. हें माझ्या जीवनांतील एक मोलाचें समाधान आहे.

माझ्या या विद्याव्यासंगाला कॉम्प्युटरचें कमालीचे सहाय्य झालें. अवघे ६ हजार रूपये देऊन आज मी

३० हजाराचा कॉम्प्युटर वापरतो आहे. एका मुलाला त्याच्या अडचणीच्या वेळीं मदत केली म्हणून त्याने हा माझ्या घरीं आणून ठेवला. आतां तो नेण्यास तयारच नाही. तो म्हणतो, ‘‘सवडीनुसार मी तुमचे सर्व पैसे देईन. पण हा कधीच नेणार नाही. तुमच्याकडे माझ्या कॉम्प्युटरचें सोनें झालें. तुम्ही तो हयातभर वापरा. यावर मी ३/४ हजार रूपये खर्च केला. ॲन्टिव्हायरस सॉफ्टवेअर, विंडो, एक्स्पी आणि व्हिस्टा दोन्हींचाहि समावेश केला आहे. पेन ड्राईव्ह, सी.डी. राईटिंग असा खूप उद्योग केला. यावर टाईप केलेल्या लेखांच्या पुष्कळ फाईल्स तयार झाल्या आहेत.

‘इलेक्ट्रॉनिक्स : प्रारंभ व प्रवास’ असा माझा एक लेख-संग्रह आहे. यांत कॅसेटची अंतर्गत रचना,स्पीकरची अंतर्गत रचना व कार्य यांतील बारकाव्यांचें तपशीलवार वर्णन दिले आहे.

२१ जुलै १९६९ अपोलो ११ चंद्रावर उतरलें. त्या संपूर्ण वर्षभर मी ‘स्पेस’ या विषयाचा फार खोलवर जाऊन अभ्यास केला. सगळी वर्तमानपत्रें, मासिकें यांचा भलामोठ्ठा गठ्ठा तयार झाला. त्यांतील शेकडो कात्रणें कापून काढली. १९६९सालीं पेपरची किंमत १० पैसे होती. २१, २२, २३, २४, २५ या दिवसांच्या त्या वेळच्या सकाळच्या पहिल्या पानांच्या एका कंपनींतील कॉन्ट्रॅक्टरने मला पांढऱ्याशुभ्र झेरॉक्स

दिल्या. नवीन पेपर्स आत्ता १०/१० पैशाला आणले आहेत असे वाटतें.

२१ जुलै १९६९ या दिवशी सकाळीं मानवाने विश्वांतील दुसऱ्या ग्रहगोलावर पहिले पाऊल ठेवलें. म्हणून माझ्या 'महाराष्ट्र पंचांग दिनदर्शिकेंत' अंतराळ युगांतील 'विश्वशक' प्रारंभ झाल्याचे मानले आहे. आणि यावर एक मोठा लेख लिहिला आहे. सकाळकाराने कधी वापरला नाही असा मोठा टाईप वापरला आहे.

# मानव चंद्रावर उतरला.

आपला मूळ विषय घेऊं. मागे लिहिल्याप्रमाणें माझ्या आयुष्यांतील पहिला लेख २००३ सालांतील म्हणजे वयाच्या ६५व्या वर्षीचा आहे. तोपावेतों टाचणें, टिपणें असंख्य लिहिली पण मला त्यांत कांहीं दम वाटेना. १९४९ पासून शालेय अभ्यास संभाळून मला नानाविध विद्याव्यासंगाचा जो एक विलक्षण छंद जडला तो उत्तरोत्तर वाढतच गेला. इयत्ता ४थी पासून ७वी पर्यन्त एका भल्या मोठा लाकडी पेटाऱ्यांत मेळ्यांच्या पद्यावल्या, सिनेमांच्या पद्यावल्यामधून फाडलेल्या चांगल्या गाण्यांच्या कागदांचें एक मोठे पुडकें, स्तोत्रें, मंगलाष्टकें, श्लोकांची पुस्तकें, छोटे काव्यसंग्रह, कथा

संग्रह, असा एक अजबखाना तयार झाला होता. ८ वी नंतर उपनिषदापासून कुसुमाग्रजापर्यन्त प्राथमिक स्वरूपाची बरीच पुस्तकें जमा केली. १९५७ म्हणजे कॉलेजच्या पहिल्या वर्षापासून ते १९६३ पर्यन्त म्हणजे डिफेन्समध्यें सर्व्हिसला लागेपर्यन्त जास्त मोठी पुस्तकें वाचण्यास सुरवात केली. १९४९ ते १९६३ पर्यन्त आत्मचिंतन, मनोमंथन प्रचंड प्रमाणांत झालें.

मला असे वाटतें, मला तसे वाटतें, हें मला पसंत नाही, हें माझें मत आहे, मला असे ठामपणें वाटतें इत्यादि. या सर्वांच्या उलटसुलट कोलांटउड्या त्या १४ वर्षांत मी हजारोवेळां मारल्या. आपण ही ज्ञान-साधना करतो का? कां शें-पाचशें पुस्तकें वाचून आपण आपल्या लाडक्या कल्पना कुरवाळतो आहोत? ही ज्ञान साधना नाही तर हा शहाणपणांतील वेडेपणा सुरूं झाला आहे. या सर्व गोष्टी ध्यानीं आल्यावर माझें डोकें भणाणून गेले. मी कमालीचा अंतर्मुख झालो. हा माझा अनुभव आहे. कोण तूं? काय तुझी हैसियत? हें कसलें मनोराज्य करीत राहिला आहेस? हें व्यर्थ कालहरण आहे.

तत्त्वज्ञान, धर्म, काव्य, साहित्य, भाषा—संस्कृत, मराठी हे माझे जिव्हाळ्याचे विषय आहेत. या देशांत प्राचीन काळापासूनचे प्रचंड संस्कृत भांडार आहे. मराठींतहि ज्ञानदेव कालापासून म्हणजे शके १२१२

पासून हजारो उत्तमोत्तम ग्रंथ निर्माण झाले आहेत. मी असे ठरविले कीं, आजपर्यन्तच्या ज्ञानाची वस्तुस्थिती नीट बारकाईनें आणि दक्षतेनें पहायची. १९६३ पासून १९९८ पर्यन्त म्हणजे नोकरीला लागल्यापासून सेवानिवृत्त होईपर्यन्त निवडक मोठमोठ्या ग्रंथांचें सपाटून वाचन केले.अजिबात हयगय केली नाही.तरूणपणांतील जो जोश होता, त्याचा पुरेपूर फायदा घेतला. नोकरींतील एकच जागा मी कायमची धरून ठेवली. प्रमोशनकडे पूर्ण पाठ फिरवली. यामुळें मला पेन्शन बरीच कमी आहे. काम कांहींच नसायचे पण नाईट डयूटीला लोक कंटाळा करायचे. कारण सिक्युरिटी चेकिंगमुळें रात्रीं झोपतां येत नसे. जागे रहावे लागे. मला ही सुवर्ण संधी मिळाली. मी कायमची नाईट मागून घेतली. एका रात्रींत ४/५शे पानांचा ग्रंथ वाचून पार करीत असे. ज्यांचा संग्रह करण्याची आवश्यकता नाही, नुसत्या वाचनानें काम भागेल अशी पाच हजार मोठे ग्रंथ व पुस्तकें नोकरीच्या त्या ३५वर्षांत मी वाचून काढली. मात्र ज्यांचा संग्रह करणें अपरिहार्य आहे अशी दीड हजार ग्रंथ व पुस्तकें सरळ खरेदी केली. यांत त्या स्वस्ताईच्या काळांत हजारो रूपये खर्च झाले. आज त्यांची किंमत लाखांत होईल. या सर्वांची ५०/६० पानांची उत्तम सूची मी तयार करून ठेवली आहे. ज्याला चिरंतन वाङ्मय म्हणतात अशा ग्रंथांचें

वाचन कसे करावे ही फार अवघड कला आहे. यासाठीं कांहीं पथ्यें कठोरपणे पालन करण्याची सवय लावून घ्यावी लागते. ती जिरवावी, मुरवावी लागतात. आय. टी. म्हणजे इंडियन टॅलेंट हें क्षेत्र पहा. केवढी प्रकांड बुद्धि त्यांत काम करते आहे. इन्फर्मेशन टेक्नॉलॉजी अथवा इंटर्नेट याचा पुष्कळच उपयोग आहे. पण हें ज्ञान नव्हें, इंटर्नेटला ज्ञान समजणें ही २१साव्या शतकांतील अंधश्रद्धा आहे. या क्षेत्रांत आजघडीला अगदी सुमार बुद्धि काम करते आहे. गाडीभर माहिती गोळा करणें हें ज्ञानाचें लक्षण नाही, भारवाहकाचें लक्षण आहे.

तत्त्वज्ञान, धर्म, काव्य, साहित्य या क्षेत्रांत तर आनंदी आनंद आहे. हें मानवाच्या अंतर्जीवनाचें आय. टी. क्षेत्र आहे. या देशाला गॉड इंन्टॉक्सिकेटेड लॅन्ड म्हणजे ईश्वरानें अभिभूत झालेली भूमि असे म्हटले जाते. येथे खरा इंडियन टॅलेन्ट दिसला पाहिजे. आज संपूर्ण उलटा कारभार सुरूं झाला आहे. आज या क्षेत्राला बुद्धिमत्तेचे, विद्वत्तेचे वावडे दिसते आहे. आज या क्षेत्रांत एज्युकेटेड, हायली एज्युकेटेड लोक आहेत. पण लर्नेड दुर्मिळ झाले आहेत. आज शांकरभाष्यावर कोणीहि प्रवचन करीत नाहीत. मम्मटाच्या काव्यप्रकाशा वर कोणी लिहित नाही, जगन्नाथाचा रसगंगाधर तर सर्वांनी जसाकाय वर्ज मानला आहे. ब्रह्मसूत्रशारिरभाष्य

हा आचार्यांचा १८०० पानांचा ३ खंडांत विभागलेला ग्रंथ पहा. १९४० सालांतील ‘ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान’ हा नागपूर युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर शं. दा. पेंडसे यांचा ६०० पानांचा ग्रंथ. त्यावेळीं त्यावरील छापील किंमत ४ रूपये होती. १९६५ साली तो मला ४० रूपयास मिळाला. आज त्याची किंमत ५०० च्या पुढे जाईल. ‘सौंदर्यशोध आणि आनंदबोध’— रा. श्री. जोग. ‘साहित्यांतील संप्रदाय’ मोठा ग्रंथ—रा.शं.वाळिंबे. तसेच त्यांचा ‘ज्ञानेश्वरींतील विदग्ध रसवृत्ति’ १९५३ सालांतील अगदी बारीक टाईप, ग्लेज कागद, किंमत त्याकाळीं १०रूपये. अफाट परिश्रम करून लिहिला आहे. ३५० पृष्टांचा साहित्यावरील ग्रंथ असल्यामुळें आज त्याची किंमत भरमसाठ होईल.

‘यादवकालीन मराठी भाषेचें व्याकरण’ पुणे विद्यापीठांत मराठी फॅकल्टीचे डीन असलेलें शं. गो. तुळपुळे, मला दांडेकरच म्हणाले, त्यांच्या या ग्रंथाचा बारकाईने अभ्यास करून मी ‘मोगरा फुलला’ ही कादंबरी लिहिली. ही संपूर्ण कादंबरी पूर्णपणें यादवकालीन भाषेंत आहे. ‘मराठी वाङ्मयाचा इंग्रजी अवतार’ असे चमत्कारिक नांव असलेलें दत्तो वामन पोतदार यांचें १९२२ सालांतील अत्युत्तम पण अतिशय दुर्मिळ असलेलें पुस्तक दांडेकरांनी मागितलें. मी म्हणालो, कधी परत देणार ते सांगा. त्यांनी

सांगितलेल्या मुदतींत ८व्या दिवशीं मला घरीं आणून दिलें. माणसे जातात पण त्यांचे गुण ध्रुवासारखे सदैव चमकत राहतात हेच खरे!

आतां वेदवाङ्मय सोडले तर सर्वांत प्राचीन ग्रंथ गीतेशिवाय दुसरा कोणताच दिसत नाही. श्रीमद्भगवत् गीता बुद्धपूर्व १,००० वर्षें अस्तित्वांत होती. म्हणजे इसवी सनपूर्व ३,५०० वर्षांपासून ती अस्तित्वांत आहे. इतकी ती प्राचीन आहे. इसवी सन २,००० नंतरच तिला महाभारताच्या शांतिपर्वांतून वेगळी काढून तिच्यावर भाष्य करण्याची परंपरा सुरूं झाली असावी असे अनुमान शंकराचार्यांचें जें सर्वांत प्राचीन भाष्य त्यावरून होते. ते म्हणतात, ‘‘तदर्थाविष्करणाय अनेकैः विवृतपदपदार्थवाक्यार्थन्यायं अपि लौकिकैःअत्यन्तविरूद्ध अनेकअर्थत्वेन गृह्यमाणं उपलभ्य......’’ शंकराचार्यानंतर रामानुज, वल्लभ, निंबार्क, श्रीधर इत्यादि संस्कृत भाष्यकार झाले. मराठीमध्यें ज्ञानदेव, वामन पंडित, यांची भाष्यें; तसेच अंबेजोगाईचे दासोपंत यांनी सव्वा लाख ओव्यांचा ‘गीतार्णव’ असा एक महासागर निर्माण करून ठेवला आहे. त्यांना रोज १ ढब्बू पैशाची शाई लागत असे; एवढे अफाट लेखन ते करीत असत.

यानंतर १९ आणि २० या दोन शतकांत गीतेवर मराठी, हिंदी, इंग्रजी अशा भाषेंत टीकात्मक शेंकडो ग्रंथ निर्माण झाले. १९१५ सालीं लोकमान्य टिळकांचें

'गीतारहस्य' प्रकाशित झाल्यावर त्यावरील अनुकूल प्रतिकूल टीका प्रतिटीकांचें जें तुंबळ युद्ध या पुण्यनगरींत गाजलें त्यामुळें महाराष्ट्राच्या बुद्धीला जी एक विलक्षण धार आली आणि चिंतनाची जी गहनता प्राप्त झाली तिला तोड नाही. या समुद्र मंथनांतून अनेक तोलामोलाची ग्रंथरत्नें निर्माण झाली; त्यांतील निवडक बरीचशी मी खरेदी केली. वर उल्लेखित भाष्यें आणि टीका मिळून १०० पेक्षाहि जास्त ग्रंथ मी खरेदी केले. या सर्वांमुळें गीतेमध्यें मला खोलवर प्रवेश करता आला.

गीतेवरील लेखमाला हें माझें सर्वांत महत्वाचें लेखन आहे. गीतेवर गेली ५० वर्षें चिंतन, मनन, निदिध्यासन करीत आलो आहे. गीतेमधील अनेक विषयांच्या संशोधनासाठीं मी कमालीचे परिश्रम केलें. गीतेवर अनेकांनी लिहिले आहे पण तें गोलमोल लेखन झाले आहे. गीतेचा सर्वांगीण अभ्यास बहुतेक कोठेच दिसत नाही. गीतेंतील श्लोक आणि पदें यांच्या संन्निधिला तर मुळीच धरून नसतो हा त्यांतील सर्वांत मोठा दोष आहे. गीतारहस्याच्या वेळीं कांहीं काळ खूप मोठे चैतन्य निर्माण झालें होतें. आतां तर सगळा थंडा मामला झाला आहे. मोठमोठे लेखक पुन्हा पूर्वीचेच जुने दळण दळीत बसले आहेत. खरे म्हणजे या लेखकांना गीतेचे मोलच कळले नाही. जीवनांत तिचें

नेमके स्थान काय आहे याचा त्यांना ख-याअर्थी पत्ता नाही.जीवन डावावर लागल्यावर माणसाने मदतीसाठीं धावाधाव करावी तसा तो ग्रंथ आहे. गीतेवर लिहिण्यासाठीं केवढे परिश्रम घ्यावे लागतात आणि किती अफाट वाचन करावे लागते त्याची या वेड्यांना कशी कल्पना येणार? यामुळें आजघडीला गीतेवरील जुजबी लेखांनी वर्तमानपत्रांची जागा अडविली जाते आहे. अफाट वाचन का करावे लागते? त्याचें कारण सांगतो—

ब्रिटीश अमदानींत व नंतरहि गेल्या २०० वर्षांत प्रचंड प्रमाणांत इतक्या चुकीच्या संस्काराचा पगडा बसला आहे आणि आमची बुद्धि इतकी भ्रष्ट झाली आहे कीं, ती भ्रष्ट झाली आहे याचाहि आतां पत्ता लागेनासा झाला आहे. वेड्याला कधी वाटते का आपण वेडे आहोत म्हणून? तो शहाण्याला म्हणतो, ‘‘तूं वेडा आहेस का? कशी वेड्यासारखी बडबड करतोस.’’ उपमन्यू पाण्यांत कालवलेलें पीठ व साखर दूध म्हणून पीत होता. आई मला रोज दूध देते असे आईविषयीं तो मोठ्या अभिमानाने सांगे. पुढील कथा सर्वश्रुत आहे. तुलनेला दोन विरोधी वस्तू हव्यात ना ! खरे दूध पिल्यावरच तुलना सुरूं झाली. या विस्ताराचा इत्यर्थ असा कीं, या भयंकर बुद्धिभेदाच्या काळांत अफाट वाचनाशिवाय तरणोपाय नाही. येथे थांबतो.